संजय गांधी राष्ट्रीय उद्यानातील अतिक्रमकांच्या पुनर्वसन प्रक्रियेमध्ये येणाऱ्या अडचणींवर उपाययोजना सुचविण्यासाठी विधान मंडळातील सदस्यांची समिती गठीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्युएलपी ०८.२३/प्र.क्र.२२७/फ-१**
मंत्रालय, मुंबई.
दिनाक :- ११ ऑगस्ट, २०२३

**प्रस्तावना :-**

"वन खात्याच्या जागेवरील पात्र असलेल्या उर्वरित झोपडीवासियांचे पुनर्वसन करणे" या विषयावर उपस्थित केलेल्या लक्षवेधी सूचना क्रमांक ५०६ च्या चर्चेदरम्यान विधान मंडळामध्ये मा. मंत्री (वने) महोदयांनी संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाच्या जागेवरील अतिक्रमण धारकांचे यापूर्वी केलेले पुनर्वसन, उर्वरित अतिक्रमण धारकांचे पुनर्वसन करण्यात येत असलेल्या अडचणी या संदर्भात चौकशी करुन उपाययोजना करणेबाबत विधीमंडळ सदस्यांची समिती गठित करण्यात येईल असे निवेदन केले आहे. त्या अनुषंगाने उपाययोजना सुचविण्याकरीता समितीची स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाच्या जागेवरील अतिक्रमण धारकांचे यापूर्वी केलेले पुनर्वसन, उर्वरित अतिक्रमण धारकांचे पुनर्वसन करण्यात येत असलेल्या अडचणी या संदर्भात चौकशी करुन उपाययोजना सुचविण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | मा. मंत्री (वने) | अध्यक्ष |
| २ | श्री. आशिष शेलार, वि.स.स. | सदस्य |
| ३ | श्री. प्रविण दरेकर, वि.प.स. | सदस्य |
| ४ | श्री. अतुल भातखळकर, वि.स.स. | सदस्य |
| ५ | श्री. प्रकाश सुर्वे, वि.स.स. | सदस्य |
| ६ | श्री. अमित साटम, वि.स.स. | सदस्य |
| ७ | श्री. सुनिल प्रभु, वि.स.स. | सदस्य |
| ८ | श्रीमती मनिषाताई चौधरी, वि.स.स. | सदस्य |
| ९ | श्री. महादेव जानकर, वि.प.स. | सदस्य |
| १० | श्री. सुनिल राणे, वि.स.स. | सदस्य |
| ११ | श्री. मिहीर कोटेचा, वि.स.स. | सदस्य |
| १२ | श्री. राजहंस सिंह, वि.प.स. | सदस्य |

सदर समितीचे समन्वयक म्हणून वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली हे काम पाहतील. समितीचे समन्वयक म्हणून त्यांनी समितीची बैठक आयोजित करण्याबाबत कार्यवाही करणे, बैठकीकरीता आवश्यक माहिती उपलब्ध करुन देणे व समितीच्या निदेशानुसार गृहनिर्माण विभाग, नगर विकास विभाग, झोपडपट्टी पुनवर्सन प्राधिकरण, महाराष्ट्र गृह निर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण, बृहन्मुंबई महानगर पालिका, मुंबई / मुंबई उपनगर, जिल्हाधिकारी व विषयाशी संबंधित इतर विभागातील अधिकारी / कर्मचाऱ्यांना बैठकीकरीता उपस्थित राहण्यासाठी कळविण्याची कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०८१११५२०४४२६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5712CE2D7A095C22E97EBB8F03C668B12EBA1DB0DD8E284883B7BD7FA74DA65D, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2023.08.11 15:22:32 +05'30'

**( सिध्देश सावर्डेकर )**
**विशेष कार्य अधिकारी**
**महसूल व वन विभाग**

**प्रत माहिती आणि उचित कार्यवाहीसाठी**

१) मा. मुख्यमंत्री, यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) श्री. आशिष शेलार, वि.स.स.
४) श्री. प्रविण दरेकर, वि.प.स.
५) श्री. अतुल भातखळकर, वि.स.स.
६) श्री. प्रकाश सुर्वे, वि.स.स.
७) श्री. अमित साटम, वि.स.स.
८) श्री. सुनिल प्रभु, वि.स.स.
९) श्रीमती मनिषाताई चौधरी, वि.स.स.
१०) श्री. महादेव जानकर, वि.प.स.
११) श्री. सुनिल राणे, वि.स.स.
१२) श्री. मिहीर कोटेचा, वि.स.स.
१३) श्री. राजहंस सिंह, वि.प.स.
१४) प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१६) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१७) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चि, मुंबई.
१८) मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनवर्सन प्राधिकरण, मुंबई.
१९) उपाध्यक्ष, महाराष्ट्र गृह निर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण, मुंबई.
२०) आयुक्त, बृहन्मुंबई महानगर पालिका, मुंबई.
२१) जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर, मुंबई.
२२) वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली.
२३) निवडनस्ती, फ-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.